“श्रीक्षेत्र जेजुरी गड तीर्थक्षेत्र विकास आराखडा, तालुका पुरंदर, जिल्हा पुणे”
निधी वितरणाबाबत.

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
शासन निर्णय क्रमांक-तीक्षेवि- २०२३/प्र.क्र.४४/का.१४४४-अ
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १८ मार्च, २०२४

वाचा : १) नियोजन विभाग शासन निर्णय क्र. तिक्षेव-२०२१/प्र.क्र.४५/का.१४४४, दि. २८.०६.२०२२
२) नियोजन विभाग शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.४४/का.१४४४-अ, दि.२९.०१.२०२४
३) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, पुणे यांचे क्रमांक : जिनिसपु/नि-४/जेजुरी गड/आराखडा/४५४/२०२४, दि.१४.०२.२०२४ रोजीचे पत्र.

प्रस्तावना :

वाचा क्र.१ अन्वये “श्रीक्षेत्र जेजुरी गड तीर्थक्षेत्र विकास आराखडा, तालुका पुरंदर, जिल्हा पुणे” विकास आराखडयास दि. २८ जून, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.१०९.५८ कोटीच्या कामांना मंजुरी देण्यात आली आहे. वाचा क्र.२ अन्वये या आराखडयाकरिता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता पुरातत्व विभागाच्या विविध कामांसाठी रु.८.०० कोटी निधी वितरीत करण्यात आला आहे. आता जिल्हाधिकारी, पुणे यांना पुरातत्व विभागाच्या विविध कामांकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

“श्रीक्षेत्र जेजुरी गड तीर्थक्षेत्र विकास आराखडा, तालुका पुरंदर, जिल्हा पुणे” विकास आराखडयांतर्गत पुरातत्व विभागाच्या विविध कामांकरीता जिल्हाधिकारी, पुणे यांना सन २०२३-२४ अंतर्गत मुख्य लेखाशिर्ष (५४५२ ०१९६) उद्दिष्ट “५३ मोठी बांधकामे” अंतर्गत खालील कामांसाठी एकुण रु.१२.०० कोटी (रुपये बारा कोटी फक्त) इतका निधी पुढील प्रमाणे वितरीत करण्यात येत आहे :-

(रु.कोटीत)

| अ.क्र. | कामाचे नाव | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| १ | मुख्य खंडोबा मंदिर आणि इतर सहायक संरचनांसह संपूर्ण तटबंदीचे जतन व दुरूस्ती करणे | २.०० |
| २ | दीपमाळेचे जतन व दुरूस्ती करणे | १.०० |
| ३ | उत्तर, पूर्व आणि पश्चिम पायऱ्या, १३ कमानी आणि सहायक संरचनांचे जतन आणि दुरूस्ती | ३.०० |
| ४ | होळकर तलाव, पेशवे तलाव आणि इतर जलकुंड, तसेच पायऱ्या असलेल्या विहिरी यांचे जतन व दुरूस्ती | २.०० |
| ५ | कडे पठार येथील खंडोबा मंदिर आणि इतर सहायक संरचना यांचे जतन व दुरूस्ती करणे | १.५० |
| ६ | शहरातील पुरातन मंदिरांचे जतन व दुरूस्ती (मल्हार गौतमेश्वर मंदिर, लवथळेश्वर मंदिर व बल्लाळेश्वर मंदिर) | १.०० |
| ७ | कडेपठारच्या दिशेने जाणाऱ्या दोन मार्गाच्या बाजूच्या संरचना, पायऱ्या यांचे जतन व दुरूस्ती (३ कमानी, २ वापरात नसलेल्या संरचना, १ बानुबाई मंदीर) | १.५० |
| | एकूण | १२.०० |

२. सदरहू खर्च "श्रीक्षेत्र जेजुरी गड तीर्थक्षेत्र विकास आराखडा, तालुका पुरंदर, जिल्हा पुणे" या विकास आराखडयाअंतर्गत मंजूर कामांवर होणारा खर्च "लेखाशिर्ष ५४५२, पर्यटनावरील भांडवली खर्च, ५३-मोठी बांधकामे, (००) (१३) (५४५२ ०१९६) कार्यक्रम" याखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. वर नमूद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व प्रधान महालेखापाल, मुंबई यांचे कार्यालयाने नोंदविलेला खर्च याचा ताळमेळ घालण्यात यावा. तसेच वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, पुणे यांनी शासनास तात्काळ सादर करावे.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.२३१/२०२४/व्यय-८, दिनांक १३.०३.२०२४ अन्वये प्रदान केलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१८१७३७३३८११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2024.03.18 17:47:16 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**आवश्यक कार्यवाहीसाठी,**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे.

**प्रत,**

३) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
५) जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे
६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
७) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई
८) कार्यासन (व्यय-८, अर्थ-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती (का.१४४४-अ), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.